सहकारी सूत गिरण्यांना देण्यात आलेल्या शासकीय भागभांडवलाची परतफेड करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सूतगि ३३१६/प्र.क्र.८१/टेक्स १ (अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
तारीख: १० जुलै, २०१७.

वाचा :-

**Co-Operation and Textile Department Resolution No.SOOTAGI-1197/C.R.193/Tex 1 A, dt.24 th March, 1999.**

प्रस्तावना :-

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या दि.२४ मार्च, १९९९ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या अनु. क्र.५ मधील तरतूदीनुसार शासनाने सूतगिरणीला दिलेल्या शासकीय भागभांडवलाची परतफेड सूतगिरणी सुरु झाल्यानंतर / उत्पादनाखाली आल्यानंतर ५ वर्षांनी किंवा शासकीय भागभांडवलाचा शेवटचा हप्ता सूतगिरणीस अदा केल्यानंतर ५ वर्षांनी यापैकी जे नंतर असेल तेव्हापासून सूतगिरणीला दिलेल्या शासकीय भागभांडवलाची परतफेड करण्याची तरतूद आहे, परंतु सदर तरतूदीमुळे सहकारी सूतगिरण्यांकडून शासकीय भागभांडवलाची प्रभावी वसुली होण्यात अडचणी येत आहेत व त्यामुळे शासकीय भागभांडवलाचा मोठा निधी सूतगिरण्यांकडे अडकून पडतो या बाबीचा विचार करता सदर तरतूदीमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन निर्णय दिनांक २४ मार्च, १९९९ सोबतच्या सहपत्रातील अनु.क्र ५ येथील अटीमध्ये खालील प्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

"सूतगिरणीने भागभांडवलाचा पहिला हप्ता स्विकारल्यानंतर ५ वर्षांनी किंवा सूतगिरणी सुरु झाल्यानंतर ३ वर्षांनी यापैकी जे आधी घडेल तेव्हापासून उचल केलेल्या भागभांडवलाची परतफेड १/१५ प्रमाणे सुरु करण्यात येईल आणि असे न केल्यास त्यावर दरसाल दरशेकडा १२ % प्रमाणे व्याज आकारण्यात येईल."

सदरचा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या मान्यतेने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२४/१७/व्यय-२, दिनांक २७.२.२०१७ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१०१४२३१६८९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2017.07.10 14:22:47 +05'30'

**( विशाल मदने )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था, मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती.
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
५. महालेखापाल, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
६. प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, औरंगाबाद / मुंबई / सोलापूर / नागपूर.
७. जिल्हा उप निबंधक सहकारी संस्था (सर्व जिल्हे).
८. संचालक, वस्त्रोद्योग महासंघ, वकील हाऊस, बेलार्ड इस्टेट, मुंबई.
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. वित्त विभाग, (व्यय २), मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग, (का.१४३१), मंत्रालय, मुंबई.
१३. सहकारी सूतगिरण्यांचा राष्ट्रीय महासंघ मर्या., मर्झबान रोड, मुंबई.
१४. संचालक, विमा, फ्रि-प्रेस जनरल मार्ग, मुंबई.
१५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंड्ळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),
१६. निवडनस्ती (टेक्स १-अ) / (टेक्स १-ब).